महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली
सैन्यातील शौर्यपदक/सेवापदक धारकांना
अनुज्ञेय रक्कम मंजूर करणेबाबत.
४०७६७ ए व्हाईस एडमिरल किशोर
ओमकार ठाकरे. NM,AVSM, जि. नागपूर

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मगौपु-२०१७/प्र.क्र. १८२ /२८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २५.०७.२०१७.

वाचा-

१) शासन निर्णय,सा. प्र. वि. क्र. शौपपु २००८/प्र. क्र. ४९/२८, दिनांक ०७.०५.२०११,
२) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.१६२११/ गौ.पु /प्रस्ताव/ सैकवि-१६/ २३६५, दिनांक १७ जुलै, २०१७

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेंतर्गत सैन्यातील १४ प्रकारच्या शौर्यपदक/सेवापदक धारकांना शासकीय अनुदान देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. ४०७६७ ए वाईस एडमिरल किशोर ओमकार ठाकरे, NM, AVSM, यांना राष्ट्रपती सचिवालयाच्या अधिसूचना क्र ७ प्रेस/२०१३, दिनांक २६ जानेवारी, २०१३ अन्वये **" अति विशिष्ट सेवा पदक"** हे पदक प्रदान करण्यात आले आहे. ए वाईस एडमिरल किशोर ओमकार ठाकरे, NM, AVSM यांना यापूर्वी नौसेना पदक प्राप्त झाले आहे त्यानुसार आता प्राप्त अति विशिष्ट सेवा पदकाची एकूण रक्कम रु. ८५,०००/ - नौसेना पदकाची यापूर्वी देण्यात आलेली रक्कम रु. २३, ०००/- वजा जाता रु. ६२,०००/- इतके अनुदान देण्याचा प्रस्ताव संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी दिनांक १७ जुलै,२०१७ च्या पत्रान्वये सादर केला आहे.

**शासन निर्णय-**

उपरोक्त नमूद शासन निर्णय व प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील तक्त्यात दर्शवल्याप्रमाणे महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली अनुज्ञेय असलेली अनुदानाची रक्कम देण्यास शासनाची मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | शौर्य/सेवापदक धारकाचे पदनाम, नाव व पत्ता | शौर्य/सेवापदक | पदक प्राप्त झाल्याचा दिनांक | देय एकूण रोख रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|
| | ४०७६७ ए वाईस एडमिरल किशोर ओमकार ठाकरे NM, AVSM, २७२- ए, लक्ष्मीनगर, नागपूर | **अति- विशिष्ट सेवा पदक** | २६ जानेवारी,२०१३ | **६२,०००/-** |
| | | | **एकूण** | **६२,०००/-** |

२. या प्रयोजनार्थ होणारा **रु.६२,०००/-** (रुपये बासष्ट हजार फक्त) इतका खर्च 'मागणी क्र.ए-४, लेखाशिर्ष २०७५, संकीर्ण सर्वसाधारण सेवा, ८०० - इतर खर्च, (००)(०५) शौर्यासाठी पारितोषिके (२०७५ ०११ ३) ०५ - बक्षिसे' या लेखाशीर्षाखाली सन २०१७-२०१८ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच सदरचा खर्च हा मासिक निधी विवरणपत्रानुसार करण्याची दक्षता घेण्यात यावी. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी,नागपूर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.**सदरची रकक्म जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, नागपूर यांनी कोषागार कार्यालय, नागपूर येथून आहरीत करुन संबंधितांना विहीत पध्दतीने वितरीत करण्यात यावी.**

३. वरील तक्त्यात नमूद केलेली संबंधित रक्कम लाभार्थ्याची पात्रता काळजीपूर्वक तपासून विहीत मुदतीत देण्याच्या सूचना संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या क्षेत्रीय अधिका-यांना द्याव्यात व तत्संबंधीचा अहवाल तात्काळ शासनास पाठवावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.शौपपु-२००८/प्र. क्र. ४९/२८, दिनांक ७.५.२०११ मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७२६११३२१५३८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Mahadeo Jakate

Digitally signed by Kishor Mahadeo Jakate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=00b70645b34ddd8d9284241878 2eb54a6897ffe96f4da14db285f027cafa55 d1, cn=Kishor Mahadeo Jakate
Date: 2017.07.26 11:39:33 +05'30'

(कि. म. जकाते)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२,
४. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
५. जिल्हाधिकारी, नागपूर,
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),
८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, नागपूर,
९. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई,
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
११. ४०७६७ ए व्हाईस एडमिरल किशोर ओमकार ठाकरे, NM,AVSM, २७२ ए, लक्ष्मीनगर, नागपूर
१२. वित्त विभाग (व्यय ४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१३. प्रत संग्रहार्थ.